**अनुसूचित जाती व नवबौध्द घटकातील महत्वाच्या स्थळांचा विकास करणे याअंतर्गत मौजा वलनी, खसरा, क्र. ५ तह.-हिंगणा, जि. नागपूर येथे डॉ.बाबासाहेब आंबेडकर अभ्यास केंद्र वाचनालयाचे बांधकामासाठी अनुदान मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीसीएच-२०१६/प्र.क्र.१४०/बांधकामे**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : ०४ मे, २०१७.

वाचा :-

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बीसीएच-२०१४/ प्र.क्र.६१/ बांधकामे, दि.१६/१२/२०१५.
२) आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र. सकआ/ मावक/ ऐति.स्थळ/ जेपस्थळ/हिवरी, यवतमाळ/२०१७/का-१२/४००, दि.१६/३/२०१७.
३) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बैठक-२०१६/ प्र.क्र.४३७/ बांधकामे, दि.६/१/२०१७.
४) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बैठक-२०१६/ प्र.क्र.४३७/ बांधकामे, दि.३०/३/२०१७.

प्रस्तावना :-

अनुसूचित जाती व नवबौध्द घटकातील मान्यवर व्यक्तींची स्मारक बांधणे तसेच महत्वाच्या सांस्कृतिक व ऐतिहासीक स्थळांचा विकास करण्याच्या दृष्टीने स्वयंसेवी संस्थांना अनुदान मंजूर करण्याविषयीचे निकष मार्गदर्शक तत्वांना संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर शासन निर्णयात नमूद करण्यात आलेल्या विहित कार्यपध्दतीनुसार संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये, आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांनी मौजा वलनी, खसरा, क्र. ५ तह.-हिंगणा, जि. नागपूर येथे डॉ.बाबासाहेब आंबेडकर अभ्यास केंद्र वाचनालयाचे बांधकामासाठी शरण बहुउद्देशिय सेवाभावी संस्था, नवीन पनवेल, जि. रायगड यांच्याकडून सादर करण्यात आलेला रु. ९८,९७,०००/- इतक्या खर्चाचा प्रस्ताव मान्यतेसाठी शासनास सादर केला आहे. सदर अंदाजपत्रकात डॉ.बाबासाहेब आंबेडकर अभ्यास केंद्र व वाचनालयाची निर्मिती प्रस्तावित आहे. सदर अंदाजपत्रक कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग नं.३, नागपूर यांनी सांक्षांकित केले आहे. मा.मंत्री,(सा.न्या.व वि.स.)यांच्या अध्यक्षतेखाली गठीत समितीच्या दि. १३/७/२०१६ रोजी झालेल्या बैठकीत सदर प्रस्तावास तत्वत: मान्यता देण्यात आली. याबाबतचे आदेश संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आले आहेत. तद्नुषंगाने सदर प्रस्तावाच्या रु. ९८,९७,०००/- इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांनी शरण बहुउद्देशिय सेवाभावी संस्था, नवीन पनवेल, जि. रायगड यांच्या डॉ. बाबासाहेब आंबेडकर अभ्यास केंद्र व वाचनालयाच्या बांधकामाच्या रु.९८,९७,०००/- इतक्या रक्कमेच्या खर्चाचे अंदाजपत्रक प्रशासकीय मान्यतेकरिता शासनाकडे पाठविले आहे. त्यामध्ये ११ टक्के विद्युतीकरण खर्च (९,०५,५८७/-), ४ टक्के आकस्मिक खर्च (३,२९,३०४/-), १५ टक्के सेवाकर (४,९३,९५७/-), तरतूद करुन सदर कामाच्या एकूण रु. ९८,७९,१३३/- (रुपये अठ्ठयाण्णव लक्ष एकोणऐंशी हजार एकशे तेहतीस फक्त) इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या प्रस्तावास सार्वजनिक बांधकाम विभागाने मान्यता दिली आहे. त्यानुसार सदर कामाच्या एकूण ९८,७९,१३३/- (रुपये अठ्ठयाण्णव लक्ष एकोणऐंशी हजार एकशे तेहतीस फक्त) इतक्या रक्कमेच्या प्रस्तावास संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयांत नमूद अटीच्या तसेच खाली नमूद करण्यात आलेल्या अटींच्या अधिन राहून, या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. एकूण अंदाजपत्रकीय खर्चामध्ये शासनाचा हिस्सा ९० टक्के इतका व शरण बहुउद्देशिय सेवाभावी संस्था, नवीन पनवेल, जि. रायगड यांचा हिस्सा १० टक्के इतका असेल.

१) प्रस्तुत प्रकल्पाच्या सविस्तर प्राकलनास मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि.,पुणे व सक्षम अधिकारी, समाजकल्याण विभाग यांचे साक्षांकन घेण्यात यावे. ढोबळ स्वरुपात करण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक मंजूर करुन काम हाती घ्यावे.

२) काम सुरु करण्यापूर्वी प्रकल्पांचा नमुना नकाशा, वास्तु-मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेण्यात यावी. तसेच प्रकल्पाचे बांधकाम हाती घेण्यापूर्वी स्थानिक नगररचना प्राधिकरणाची मंजूरी घेण्यात यावी.

३) प्रकल्पाचे काम सुरु करण्यापूर्वी सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण यांनी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.

४) या कामी शासन निर्णय क्र. बीसीएच-२०१४/प्र.क्र.६१/बांधकामे, दिनांक १६/१२/२०१५ च्या शासन निर्णयांन्वये गठीत करण्यात आलेल्या जिल्हास्तरीय समितीने नियमानुसार ई-निविदा प्रक्रिया राबवुन बांधकाम यंत्रणा निश्चित करुन काम हाती घ्यावे.

५) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/तां.क.१, दि.१० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

६) प्रस्तुत प्रकल्पाचे बांधकाम सा.बां.विभागाने विहीत केलेल्या मानकानुसार, विहीत दर्जाचे व गुणवत्तेचे राहील, याकरीता प्रकल्पाची सा.बां.वि.च्या सक्षम प्राधिकाऱ्यामार्फत नियतकालीक तपासणी करुन घेणे आवश्यक राहील.

७) प्रस्तुत प्रकल्पातील इमारत बांधकामामध्ये ग्रीन बिल्डींग संकल्पना अमंलात आणुन, नैसर्गिक प्रकाशयोजना व वायुविजन, पाण्याच्या व उर्जेच्या वापरात काटकसर, पर्जन्य जलपुन:भर्रण आणि जास्तीत जास्त पर्यावरणपूरक बांधकाम साहित्य व साधन सामुग्रीचा वापर करणे आवश्यक राहील.

८) प्रस्तुत प्रकल्पातील बांधकामाचा कालावधी निश्चित करुन ते विहीत वेळेतच पूर्ण होईल, याची सबंधित सहायक आयुक्त, समाजकल्याण यांनी दक्षता घ्यावी.

९) प्रकल्पाच्या देखभाल व परिरक्षणाची जबाबदारी ही शरण बहुउद्देशिय सेवाभावी संस्था, नवीन पनवेल, जि. रायगड यांची राहील

१०) प्रस्तुत प्रकल्पामध्ये अपंगांना सोयी-सुविधा उपलब्ध होण्याच्या दृष्टीने रॅम्प, रेलींग व तत्सम सुविधा निर्माण करणे बंधनकारक राहील.

२. संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयात नमूद मार्गदर्शक तत्वांचे पालन करुन शरण बहुउद्देशिय सेवाभावी संस्था, नवीन पनवेल, जि. रायगड यांनी हाती घेतलेल्या प्रकल्पावर संनियंत्रण ठेवण्याची जबाबदारी सदर शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेल्या जिल्हास्तर समितीची राहील. परिच्छेद ३ मध्ये नमूद सर्व अटी शरण बहुउद्देशिय सेवाभावी संस्था, नवीन पनवेल, जि. रायगड यांना मान्य असल्याबाबत करारपत्र करुन घ्यावे. शासनाच्या वतीने करारपत्रावर सही करण्यासाठी विभागीय समाजकल्याण अधिकारी, नागपूर यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सहायक आयुक्त, समाजकल्याण, नागपूर यांनी प्रकल्पाच्या बांधकामाच्या सद्य:स्थितीचा त्रैमासिक अहवाल आणि वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास व आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांना वेळीच सादर करण्याची दक्षता घ्यावी.

३ संदर्भ क्र. ४ येथील दि. ३०/३/२०१७ च्या शासन निर्णयाच्या सोबतच्या विवरणपत्र "अ" मध्ये नमूद प्रस्तावांसाठी सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात मागणी क्र.एन-३, २२२५-अनुसूचित जाती,अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीय व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ०१- अनुसूचित जातीचे कल्याण, ८००-इतर खर्च, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना (०५), स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदाने (०५)(०२),स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदाने (वि.घ.यो.) (२२२५ ३६३६), ३१ - सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (योजनातर्गत-दत्तमत्त) या लेखाशीर्षाखाली मंजूर तरतूद, ठेव अंशदान स्वरुपात समन्वयक तथा कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे यांच्या अधिनस्त ठेवण्यास मान्यता देण्यात आली आहे. प्रस्तुत शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेल्या मौजा वलनी, खसरा, क्र. ५ तह.-हिंगणा, जि. नागपूर येथे डॉ.बाबासाहेब आंबेडकर अभ्यास केंद्र वाचनालयाचे बांधकाम करण्याच्या एकूण ९८,७९,१३३/- (रुपये अठ्ठयाण्णव लक्ष एकोणऐंशी हजार एकशे तेहतीस फक्त) इतक्या रक्कमेचे काम ठेव अंशदान स्वरुपात समन्वयक तथा कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे यांच्या अधिनस्त ठेवण्यात आलेल्या निधीतून करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

४. सदर योजनेअंतर्गत आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक,आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच योजनेअंतर्गत मंजूर निधीचे वितरण हे संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयातील परिच्छेद २ (२) मध्ये नमूद अटीच्या अधीन काटेकोरपणे करण्याची जबाबदारी आयुक्त, समजाकल्याण, पुणे यांची राहील.

५. प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग-पाच, अनु.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तीकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदरहु शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१७०५०४१७०५०१२४२२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vidya Vasant Kadam

Digitally signed by Vidya Vasant Kadam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0a6f1c09dc5f2c874e9a0b7c2818bd750815839f2b18d38a4d35027f76bd07e4, cn=Vidya Vasant Kadam
Date: 2017.05.04 17:07:44 +05'30'

(वि.व.कदम)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) आयुक्त, समाजकल्याण, पुणे
२) उपसचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारती-२), मंत्रालय, मुंबई-३२.
३) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर
४) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर.
५) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर.
६) महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा / लेखाअनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
७) प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग, नागपूर.
८) सहायक आयुक्त, समाजकल्याण, नागपूर.
९) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
१०) शरण बहुउद्देशिय सेवाभावी संस्था, नवीन पनवेल, जि. रायगड.
११) मा.मंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
१२) मा.राज्यमंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
१३) निवडनस्ती.